**महाराष्ट्र विकास सेवा गट -अ मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेमध्ये अंशत: बदल**

# महाराष्ट्र शासन
## ग्रामविकास विभाग

शासन आदेश क्रमांकः मविसे १०२१/प्र.क्र.१२५/२०२१/आस्था-३
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, मुंबई ४००००१
तारीख: २९ सप्टेंबर, २०२१.

<u>वाचा</u> :- शासन आदेश , ग्रामविकास विभाग, क्र.मविसे-१०२१/प्र.क्र.९८/२०२१/आस्था-३, दिनांक ०९.०८.२०२१.

**<u>शासन आदेश</u>** :-

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम , २००५ मधील तरतूदींनुसार बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४(१), ४(२) आणि ४(३) मधील तरतूदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने महाराष्ट्र विकास सेवेतील गट -अ मधील श्री.वाय.एम.प्रभे व श्री .एफ.आर.कुतिरकर यांना अनुक्रमे गट विकास अधिकारी , पंचायत समिती, उमरी, जिल्हा,नांदेड व गट विकास अधिकारी, पंचायत समिती, मोहाडी, जिल्हा,भंडारा या पदावर पदस्थापना देण्यात आली होती. सदर आदेशात सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने अंशत : बदल करुन श्री.प्रभे व श्री.कुतिरकर यांना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ४ | ५ |
| १ | श्री.वाय.एम.प्रभे,<br>गट विकास अधिकारी | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, माणगांव, जिल्हा,रायगड | श्री.प्रभे ,गट विकास अधिकारी,पंचायत समिती,म्हसळा, जिल्हा, रायगड यांची संदर्भाधिन आदेशान्वये गट विकास अधिकारी,पंचायत समिती,उमरी,जिल्हा नांदेड येथे बदली करण्यात आली होती. सदर बदली मध्ये अंशत : बदल करुन त्यांची पदस्थापना गट विकास अधिकारी, पंचायत समिती, माणगांव, जिल्हा,रायगड या रिक्त पदावर करण्यात येत आहे . |
| २ | श्री.एफ.आर.कुतिरकर,<br>गट विकास अधिकारी, | प्रकल्प संचालक, जलजीवन मिशन, जिल्हा परिषद , गडचिरोली | श्री.कुतिरकर, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्र), जिल्हा परिषद,गडचिरोली यांची संदर्भाधीन |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| | | | आदेशान्वये गट विकास अधिकारी,पंचायत समिती, मोहाडी, जिल्हा,भंडारा येथे बदली करण्यात आली होती. सदर बदलीमध्ये अंशत: बदल करुन त्यांची पदस्थापना प्रकल्प संचालक, जलजीवन मिशन, जिल्हा परिषद, गडचिरोली या रिक्त पदावर करण्यात येत आहे . |

२. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास , ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे . संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. जे अधिकारी कार्यमुक्तीनंतर विहित कालावधीत बदली झालेल्या पदावर रुजू होणार नाहीत , अशा अधिकाऱ्यांविरुध्द संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२१०९२९११३९५५२६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dr Vasant Gopal Mane

Digitally signed by Dr Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, cn=Dr Vasant Gopal Mane
Date: 2021.09.29 19:10:09 +05'30'

**(डॉ.वसंत माने)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

२) मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

३) मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,

४) मा.अतिरिक्त मुख्य सचिव (ग्रा.वि.व पं.रा.) बांधकाम भवन, मुंबई.

५) विभागीय आयुक्त, कोकण,औरंगाबाद व नागपूर.

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड,नांदेड, भंडारा व गडचिरोली.

७) जिल्हा कोषागार अधिकारी,रायगड,नांदेड, भंडारा व गडचिरोली.

८) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुश्रेयता / लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर

९) उप सचिव (आस्था-२), ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई-०१,

१०) संबंधीत अधिकारी (संबंधीत विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत),

११) निवड नस्ती (आस्था-३) ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई-०१,